**महाराष्ट्र शासन**
**उद्योग ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र: मुविनि-२०१६/प्र.क्र.८६/भाग-१/ऊर्जा५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २४ नोव्हेंबर, २०१६.

**संदर्भ :-** उद्योग ऊर्जा व कामगार विभाग शासन आदेश क्र: मुविनि-२०१६/प्र.क्र.८६/भाग-१/ऊर्जा-५ , दि.४ फेब्रुवारी,२०१६

**शासन आदेश:-**

संदर्भाधिन शासन आदेशान्वये श्री. महेंद्र गोंडू तायडे, शाखा अभियंता, यांची विद्युत निरीक्षक कार्यालय पेण (जि.) रायगड येथे बदलीने पदस्थापना करण्यात आली. तथापि, बदलीच्या ठिकाणी श्री.तायडे, शाखा अभियंता रुजू झालेले नाहीत. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४(४) (दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार आता श्री. तायडे शाखा अभियंता यांची प्रशासकीय कारणास्तव बदलीच्या ठिकाणात बदल करण्यात येत असून खाली नमूद केल्याप्रमाणे त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे:-

| अ.क्र.<br>१ | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम व सध्याचे कार्यालय<br>२ | पदस्थापनेचे पद व कार्यालय<br>३ | शेरा<br>४ |
|---|---|---|---|
| १. | श्री. महेंद्र गोंडू तायडे, शाखा अभियंता | शाखा अभियंता,उदवाहन शाखा विद्युत निरीक्षक ( सचिव, अनुज्ञापक मंडळ व उद्वाहन निरीक्षक) यांचे कार्यालय, चेंबूर (पूर्व), मुंबई-७१. | प्रशासकीय कारणास्तव बदली अधिनियम कलम ४(४) व ४(५) अन्वये |

सदर बदलीच्या ठिकाणी विद्युत निरीक्षक ( सचिव, अनुज्ञापक मंडळ व उद्वाहन निरीक्षक), चेंबूर (पूर्व), मुंबई-७१ या कार्यालयाने श्री. तायडे, यांना उदवाहन शाखेत शाखा अभियंता, या पदावर रुजू करुन घ्यावे.

तसेच या आदेशान्वये करण्यात आलेल्या बदल्या रद्द करणे किंवा त्यात बदल करणे या साठी राजकीय दडपण/ दबाव आणल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित शाखा अभियंता यांच्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगाची कारवाई सुरु करण्यात येईल.

श्री. तायडे शाखा अभियंता यांनी नियुक्तीच्या नविन ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

हे शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२४१७१०३३५५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhimashankar Yallapa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallapa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Bhimashankar Yallapa Manta
Date: 2016.11.24 17:12:32 +05'30'

**(भि.य.मंता)**
शासनाचे उपसचिव

**प्रती,**

१) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू.), मुंबई-७१.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र नागपूर
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ निवासी लेखाधिकारी, मुंबई
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पेण, जि. रायगड
५) उप सचिव (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) श्री. महेंद्र गोंडू तायडे, शाखा अभियंता
७) निवड नस्ती-ऊर्जा-५.

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५) प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२